**दि.२४ मे,२०१७ रोजी होणाऱ्या स्थानिक स्वराज्य संस्थांच्या सार्वत्रिक/ पोटनिवडणुकांसाठी सदर क्षेत्रातील मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी सुट्टी अथवा दोन तासांची सवलत देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक मतदान २०१७/प्र.क्र.५७/कामगार-९**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ०९ मे, २०१७

<u>संदर्भ</u> :- राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांचे क्रमांक रानिआ/ मनपा-२०१७/प्र.क्र.२७/का.५, दि. २५ एप्रिल, २०१७ चे पत्र.

**शासन परिपत्रक**

भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २४३ के व २४३ झेडए अन्वये राज्यातील सर्व स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निवडणुका ( महानगरपालिका, नगरपरिषदा/ नगरपालिका, जिल्हा परिषद, पंचायत समित्या व ग्रामपंचायती) मुक्त, निर्भय व पारदर्शक वातावरणामध्ये घेण्याची सर्व जबाबदारी राज्य निवडणूक आयोगाची आहे व त्यासाठी राज्य निवडणूक आयोगाने दिलेले आदेश सर्वांवर बंधनकारक आहे.

२. आपल्या देशाने लोकशाही पध्दती स्विकारली असून १८ वर्षावरील नोंदणी झालेल्या सर्व लोकांनी प्रत्येक निवडणुकीमध्ये १०० टक्के मतदान करणे अपेक्षित आहे. ही बाब लक्षात घेता मतदानाच्या दिवशी सर्वसाधारणपणे मतदारांना त्यांचा मतदानाचा हक्क बजावता यावा यासाठी भरपगारी सुट्टी देण्यात येते किंवा काही ठिकाणी कामाच्या तासात योग्य ती सवलत देण्यात येते. मात्र गेल्या काही निवडणुकांमध्ये असे दिसून आले आहे की, संस्था/ आस्थापवना इ. भरपगारी सुट्टी किंवा सवलत देत नाहीत. यामुळे अनेक मतदारांना त्यांच्या मतदानापासून वंचित रहावे लागते. जे लोकशाहीसाठी अत्यंत घातक आहे.

३. राज्य निवडणूक आयोगाने निर्गमित केलेल्या आदेशाप्रमाणे दि. २४ मे, २०१७ रोजी सोबतच्या परिशिष्ट-१ मध्ये नमूद केल्याप्रमाणे सार्वत्रिक/ पोटनिवडणुका घेतल्या जाणार आहेत. या निवडणुकांमध्ये सर्व मतदारांना त्यांचा मतदानाचा हक्क योग्यरितीने बजावता यावा यासाठी खालील प्रमाणे आदेश देण्यात येत आहेत:-

I) निवडणूक होणाऱ्या मतदान क्षेत्रात मतदार असलेले कामगार/अधिकारी/कर्मचारी यांना मग ते कामानिमित्त निवडणूक होणाऱ्या क्षेत्राबाहेर कार्यरत असले तरीही त्यांना निवडणुकीच्या दिवशी मतदानाचा हक्क बजावण्यासाठी भरपगारी सुट्टी देण्यात यावी.

II) सदर सुट्टी उद्योग,ऊर्जा व कामगार विभागांतर्गत येणाऱ्या सर्व आस्थापना, कारखाने,दुकाने इत्यादींना लागू राहिल (उदा. राज्य शासन, केंद्र शासन व खाजगी कंपन्या या मधील आस्थापना, सर्व दुकाने व इतर आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्य गृहे, नाटयगृहे, व्यापार,औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना तसेच माहिती व तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर, मॉल्स, रिटेलर्स इ.)

III) अपवादात्मक परिस्थितीत कामगार, अधिकारी, कर्मचारी इत्यादींना पूर्ण दिवस सुट्टी देणे शक्य नसेल तर, मतदान क्षेत्रातील कामगारांना मतदानाचा हक्क बजावण्यासाठी सुट्टी ऐवजी केवळ दोन ते तीन तासांची सवलत देता येईल. मात्र त्याबाबत आस्थापनांनी संबंधित महानगरपालिका आयुक्त अथवा जिल्हाधिकारी यांची

पूर्व परवानगी घेणे आवश्यक राहिल. कोणत्याही परिस्थितीत मतदारांना मतदानासाठी किमान दोन ते तीन तासांची सवलत मिळेल याची दक्षता संबंधित आस्थापना मालकांनी घेणे आवश्यक राहिल.

IV) वर नमूद केल्यानुसार उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाअंतर्गत येणाऱ्या सर्व आस्थापना, कारखाने, दुकाने इत्यादींच्या मालकांनी / व्यवस्थापनाने वरील सूचनांचे योग्य ते अनुपालन होईल याची काटेकोरपणे खबरदारी घ्यावी. मतदारांकडून मतदानाकरिता योग्य ती सुट्टी अथवा सवलत प्राप्त न झाल्याने मतदान करता येणे शक्य न झाल्याबाबत तक्रार आल्यास, त्यांच्याविरुध्द योग्य कारवाई करण्यात येईल.

४. सदर परिपत्रक राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र यांच्या क्रमांक रानिआ/मनपा-२०१७/प्र.क्र.२७/का.५, दि.२५ एप्रिल,२०१७ च्या पत्रास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५०९११२८०३९११० असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ravindra T Jadhav

Digitally signed by Ravindra T Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industries Energy and Labour Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=603978b5660f0eca32742a306629627cab3d44b5023a7b6ae5f7a2ad9b25432f, cn=Ravindra T Jadhav
Date: 2017.05.09 11:28:02 +05'30'

**( रविंद्र जाधव )**

शासनाचे अवर सचिव

**प्रत** - उपरोक्त परिपत्रक सर्व संबंधित आस्थापनांच्या निदर्शनास आणण्याच्या विनंतीसह अग्रेषित.

१. राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र,नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालयासमोर, मुंबई-३२
२. प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. कामगार आयुक्त, बांद्रा, मुंबई-५१
४. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, बांद्रा, मुंबई
५. संचालक, बाष्पके, बांद्रा, मुंबई,
६. आयुक्त, ठाणे, नाशिक, रायगड
७. जिल्हाधिकारी,ठाणे, नाशिक, रायगड, अमरावती, चंद्रपूर, अहमदनगर, लातूर, सांगली, पालघर, रत्नागिरी, सिंधुदूर्ग,सातारा, सोलापूर, जळगाव, नंदूरबार, उस्मानाबाद.
८. महासंचालक,माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई यांना व्यापक प्रसिध्दी देण्याच्या विनंतीसह अग्रेषित.
९. कामगार विभागातील सर्व कार्यासने
१०. निवड नस्ती (कामगार-९)

**प्रत माहितीसाठी :**

१ मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
२ मा. राज्यमंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव
३ मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

# परिशिष्ट-१

| सार्वत्रिक निवडणूक | |
|---|---|
| अ.क्र. | स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव |
| १ | भिवंडी-निजामपूर महानगरपालिका, जि.ठाणे |
| २ | मालेगाव महानगरपालिका,जि.नाशिक |
| ३ | पनवेल महानगरपालिका, जि.रायगड |
| ४ | धारणी पंचायत समिती, जि.अमरावती |
| ५ | नागभीड नगरपरिषद, जि.चंद्रपूर |
| ६ | नेवासा नगरपंचायत, जि.अहमदनगर |
| ७ | रेणापूर नगरपंचायत, जि.लातूर |
| ८ | शिराळा नगरपंचायत, जि.सांगली |

## पोटनिवडणुका

| अ.क्र. | स्थानिक स्वराज्य संस्था | प्रभाग व जागा क्र. |
|---|---|---|
| १ | जव्हार नगरपरिषद, जि.पालघर | १-क, ३-ब, ४-अ, ४-ब, ४-इ (एकूण ५ जागा) |
| २ | मुरुड-जंजिरा नगरपरिषद, जि.रायगड | ७-अ |
| ३ | श्रीवर्धन नगरपरिषद, जि.रायगड | ६-अ |
| ४ | चिपळूण नगरपरिषद,जि.रत्नागिरी | ९-अ |
| ५ | कसई-दोडामार्ग नगरपंचायत,जि.सिंधुदूर्ग | ७ |
| ६ | मेढा नगरपंचायत जि.सातारा | ३ |
| ७ | दुधनी नगरपरिषद, जि.सोलापूर | २-अ |
| ८ | देवळा नगरपंचायत,जि.नाशिक | १४ |
| ९ | यावल नगरपरिषद, जि.जळगाव | १-ब |
| १० | धडेगाव-वडफळ्या-रोषमाळ बु. नगरपंचायत जि.नंदूरबार | ११ |
| ११ | नंदूरबार नगरपरिषद, जि.नंदूरबार | २-क |
| १२ | उस्मानाबाद नगरपरिषद, जि.उस्मानाबाद | ११-ब |
| १३ | औसा नगरपरिषद, जि.लातूर | १०-अ |
| १४ | अचलपूर नगरपरिषद, जि.अमरावती | १९-ब |